मुख्यमंत्री सहाय्यता निधी न्यास
व्यवस्थापन समिती नियम व विनियम.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांक : सीआरएफ-२०१९/प्र.क्र.२३३/२०१९/२५**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दि. २० नोव्हेंबर, २०१९

**वाचा** : १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:सीआरएफ-१०६७/बी, दि.२.३.१९६७

२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:सीआरएफ-२००१/प्र.क्र.१९७/२००१/२५, दि.१५.११.२००१

३) शासन निर्णय क्रमांक सीआरएफ-१००९/प्र.क्र.२०९/२००९/२५, दि. १६ फेब्रुवारी, २०१०

**प्रस्तावना :-**

सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय दिनांक ०२/०३/१९६७ अन्वये राज्यातील / देशातील नैसर्गिक आपत्तीतील आपदग्रस्तांना अर्थसहाय्य करण्याच्या उद्देशाने “मुख्यमंत्री सहायता निधी” या सार्वजनिक न्यासाची स्थापना करण्यात आली आहे. सदर न्यासाकडे नैसर्गिक आपत्ती व्यतिरिक्त अन्य कारणाने पिडीत असणा-या व्यक्तींना अर्थसहाय्य करण्यासाठी विनंती अर्ज तसेच लोकप्रतिनिधींकडून व्यापक प्रमाणावर शिफारशी प्राप्त होत असल्याने, मुंबई सार्वजनिक विश्वस्त व्यवस्था अधिनियम, १९५० मधील तरतुदीनुसार सार्वजनिक न्यासाच्या ध्येय उदिष्टांच्या व्याप्तीत वाढ करण्याचा निर्णय घेऊन, शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, दिनांक १५/११/२००१ निर्गमित करण्यात आला आहे.

२. मा. मुंबई उच्च न्यायालयात”मुख्यमंत्री सहायता निधी” या न्यासाच्या विरुध्द जनहित याचिका दाखल करण्यात आली असून त्या अनुषंगाने धर्मादाय संस्थांना अर्थसहाय्य प्रदान करण्याबाबत सुधारित कार्यपध्दती व नियमावलीचा मसुदा तयार करुन शपथपत्राव्दारे मा. मुंबई उच्च न्यायालयात सादर करण्यात आला आहे. त्या अनुषंगाने मुख्यमंत्री सहायता निधीमधून धर्मादाय संस्थांना अर्थसहाय्य मंजूर करण्यासाठी सुधारीत कार्यपध्दती अनुसरण्याचा व व्यापक नियमावली तयार करुन दि.१५.२.२०१० चा शासन निर्णय निर्गमित केला आहे.

३. मुख्यमंत्री सहायता निधी या न्यासाविरुध्द मा. मुंबई उच्च न्यायालयात जनहित याचिका दाखल करण्यात आली असल्याने वैद्यकीय सहायता व नैसर्गिक आपत्तीव्यतिरिक्त अन्य कोणत्याही बाबींसाठी सदर निधीतून अर्थसहाय्य देण्यात येत नाही.

४. सद्य:स्थितीत, “मुख्यमंत्री सहाय्यता निधी” हा सार्वजनिक विश्वस्त व्यवस्था अधिनियम १९५० अंतर्गत स्वतंत्र न्यास असून मा. मुख्यमंत्री या न्यासाचे अध्यक्ष असतात. या न्यासामार्फत राज्यातील आर्थिक दृष्ट्या दुर्बल घटकातील गरजू रुग्णांना त्यांच्या उपचार व शस्त्रक्रियेकरिता आर्थिक सहाय्य पुरविले जाते. न्यासाचे कामकाज मुख्यमंत्री महोदयांच्या आदेशानुसार चालते. सद्या राज्यामध्ये राष्ट्रपती राजवट लागू झाल्यामुळे, सद्यस्थितीत मुख्यमंत्री कार्यालयात कार्यरत असणारे अधिकारी / कर्मचारी यांच्या सेवा विभागाकडे प्रत्यार्पित / वर्ग करण्यात आल्याने या विश्वस्त संस्थेचे काम स्थगित झाले आहे. त्यामुळे मुख्यमंत्री सहायता निधीतून आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकातील गरजू रुग्णांना वैद्यकीय उपचाराकरीता मदत देण्यासंदर्भातील, कार्यवाहीसाठी अनुसरावयाची कार्यपध्दत आखून देणे आवश्यक असल्याने, राज्यामध्ये मुख्यमंत्री सहायता निधीच्या कामकाजाबाबत खालीप्रमाणे शासन आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन आदेश :**

मुख्यमंत्री सहायता निधी या न्यासाचे मा.मुख्यमंत्री महोदय हे अध्यक्ष असतात. मा. मुख्यमंत्री महोदय यांच्या मंजूरीने या निधीतून आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकातील गरजू रुग्णांना त्यांच्या उपचार व शस्त्रक्रियेकरिता आर्थिक सहाय्य देण्यात येत होते. राज्यामध्ये राष्ट्रपती राजवट लागू झाल्यामुळे सद्यस्थितीत मुख्यमंत्री कार्यालयात कार्यरत असणारे अधिकारी / कर्मचारी यांच्या सेवा संबंधित विभागाकडे प्रत्यार्पित / वर्ग करण्यात आल्याने, मुख्यमंत्री सहायता निधीमधून वैद्यकीय कारणास्तव देण्यात येणारे अर्थसहाय्य देण्याची कार्यवाही तात्पुरती खंडीत झाली आहे.

२. राज्यात राष्ट्रपती राजवट लागू असल्याने वैद्यकीय मदतीसाठी गरजू रुग्णांना आर्थिक मदतीपासून वंचित रहावे लागू नये यासाठी राष्ट्रपती राजवट लागू असेपर्यंत मुख्यमंत्री सहायता निधीमधून आर्थिक दृष्ट्या दुर्बल घटकातील गरजू रुग्णांना त्यांच्या उपचार व शस्त्रक्रियेकरिता आर्थिक सहाय्य देण्याबाबत खालील प्रमाणे तात्पुरती व्यवस्था करण्यात येत आहे.

३. राज्यातील विविध भागातील रुग्णांचे नुकसान होऊ नये यासाठी खालील संस्थेकडे गरजूनी आपले अर्ज सादर करावेत.

४. मुख्य कार्यकारी अधिकारी, महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजना, जीवनदायी भवन, दुसरा मजला, राज्य कामगार विमा योजना रुग्णालय आवार, (ESIS Hospital Compound) गणपतराव जाधव मार्ग, वरळी नाका, वरळी, मुंबई-४०००१८, दुरध्वनी - ०२२-२४९९९२०३/०४/०५

५. मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजना या अंतर्गत समाविष्ट असलेल्या ५८१ समान उपचार पध्दती वगळून उर्वरित आजारांसाठी मुख्यमंत्री सहायता निधीतून अर्थसहाय देण्याच्या दृष्टीकोनातून अर्जाची छाननी करण्यात यावी. तसेच अर्जासोबत आधार कार्ड, रेशन कार्ड, उत्पन्नाचा दाखला, रुग्णालयाचे खर्चाचे अंदाजपत्रक (सोबत रोग निदानाबाबतचा अहवाल), राजीव गांधी जन आरोग्य योजना, आयुष्मान योजना यांचा लाभार्थी नसल्याची खातरजमा करूनच छाननी केलेल्या पात्र अर्जाची शिफारस, मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली असलेल्या समितीच्या स्तरावरून करण्यात यावी. अर्जाची छाननी करण्याची कार्यवाही पार करण्याकरिता लागणारा अनुभवी, आवश्यक अधिकारी, कर्मचारीवृंद अपर मुख्य सचिव (सेवा) यांनी त्वरित उपलब्ध करून देण्याची कार्यवाही करण्यात यावी. सदर अधिकारी / कर्मचारीवृंदाच्या मदतीने मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी अर्जाची स्वीकृती / छाननी इ. कार्यवाही करून घ्यावी.

६. शिफारस पात्र अर्जानुषंगाने निधी वाटपाबाबतच्या कार्यवाहीसंदर्भात सद्य:स्थितीत अस्तित्वात असलेल्या समितीच्या सदस्यांकडून याबाबत निर्णय घेण्यात येईल.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१९११२०१५५०२८९७०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Umesh Madhukar Madan
Date: 2019.11.20 17:09:52 +05'30'

**( उ. म. मदन )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे सचिव,

२. मुख्य सचिवांचे सह सचिव
३. अपर मुख्य सचिव (वित्त)
४. मंत्रालयीन विभागाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
५. सचिव व विशेष आयुक्त (मदत व पुनर्वसन)
६. धर्मादाय आयुक्त, महाराष्ट्र राज्य वरळी, मुंबई-४०००१८,
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजना, जीवनदायी भवन, दुसरा मजला, राज्य कामगार विमा योजना रुग्णालय आवार, गणपतराव जाधव मार्ग, वरळी नाका, वरळी, मुंबई-४०००१८,
८. सर्व विभागीय आयुक्त,
९. सर्व जिल्हाधिकारी,
१०. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
११. सर्व मंत्रालयीन विभाग,
१२. महासंचालक,माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई (प्रसिध्दीसाठी)
१३. व्यवस्थापक, स्टेट बँक ऑफ इंडिया, रिक्लमेशन शाखा, रहेजा चेंबर्स, नरिमन पॉईंट, मुंबई.
१४. निवडनस्ती.